संपादक : शशिकांत रणवरे

संकल्पना : भारती सरमळकर

छायाचित्र : गुगलच्या सौजन्याने


**संपर्क**

ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे – ४००६०४
esahity@gmail.com
www.esahity.com
9869674820

# संपादकीय

हा योगायोग समजावा कि आणखी काही माहित नाही पण उत्तराखंड मध्ये झालेला जल प्रलय, त्या देवाच्या नगरीत लुप्त झालेले असंख्य भक्त, आणी नुकताच महाराष्ट्रात पालखीसाठी जमलेला जन प्रलय, वारीसाठी लोटलेले, विठ्ठलमय झालेले अगणित भक्त. एकातील आक्रोष हेलावणारा तर एकातील जयघोष तितकाच सुखावणारा .

काल वारी संर्दभातील बातम्या बघत असताना, जनमानसात कडवे, कट्टर विरोधक असलेले राजकीय पक्षाचे ज्येष्ठ प्रतिनिधी फुगड्या खेळताना दिसले आणि पुढच्या क्षणी त्याच पक्षाचे दुसऱ्या राज्यातील प्रतिनिधी जलआपत्तीच्या बचाव कार्यात येत असलेल्या अडचणीत आणखी भर घालत एकमेकावर कुरघोडी करताना दिसले.

देव या संकल्पनेवरुन विश्वास उडावा असा तो प्रकोप आणी हरिनामाचा गजर करत भोवतालच्या चराचरात देव आहे असा आसमंताला भिडणार नाद करत दरीखोऱ्यातुन संथ वाहणारी वारी ,

ही परस्पर विरोधी आणि विसंगत दृश्ये संभ्रम निर्माण करण्यास पुरेशी आहेत.

देव, धर्म या संकल्पनेत रुजलेला आणी त्याच बिजातुन उमललेला आपला एकेकाळचा संत महात्म्यांचा देश आणी त्याच धर्माचा बाजार मांडुन, विनाशाकडे चाललेला भोंदु साधवांचा, थोतांडांचा केविलवाणा वाटणारा आपला देश, पुढे येणाऱ्या, घडणाऱ्या अप्रिय घटनांच द्योतक आहे अस समजायला हरकत नाही.

कोट्यावधी देवांमधला प्रत्येकाचा देव वेगळा,

मरणप्राय यातनातुन जगण्याची वाट काढताना भक्कम आधाराची गरज म्हणुन पुजला जाणारा देव वेगळा,

संस्कृती टिकवुन ठेवायची, जोपासायची, पुढच्या पिढीस हस्तांतरीत करायची म्हणून मनोभावे पुजणाऱ्यांचा देव वेगळा,

पोटाची अतृप्त खळगी भरण्यासाठी त्याच्या भोवती बाजार मांडुन त्याचा श्वास कोंडणाऱ्यांचा देव वेगळा,

दर्शनाच्या रांगेत कित्येक तास रेंगाळत, तिष्ठत आणी तरिही तितकीच श्रद्धा जपणाऱ्या गरिबांचा आणि खिशातील चार नोटा सरकवुन, इतरांचा तळतळाट उडवुन लावत वशिल्याच्या दर्शनात धन्यता मानणाऱ्यांचा देव वेगळा.

या देवरुपी मुक्या साधनाचा उपयोग सगळ्यानी आपआपल्या परीने करुन घेतला, कोणी पैसा कमवण्यासाठी, तर कोणी तोच पैसा इतरांच्या नजरेत येवु नये म्हणुन रितसर गमावण्यासाठी. राजकारण्यांचा मत मिळ देत म्हणुन मतदार हाच देव तर त्याच मतदारांचा नंतर कित्येक वर्ष दर्शन दुर्लभ होणारा आणी नको त्या कारणांसाठी चर्चेतला तोच देव.

या सगळ्या गोंधळात आमच्या सारख्या सुजाण नव्या पिढीने काय आदर्श ठेवायचा, कशी जपायची आस्था, कशी जपायची आस्तिकता.

नुस्त्या भोळ्या श्रद्धेने देव माननारा आस्तिक असेल तर आपण सगळेच आस्तिक आहोत, पण आपआपल्या सोयीने, स्वार्थासाठी, अल्प समाधानासाठी, इतरांच्या पिळवणुकीसाठी जर कळत नकळत देव मानणारे असु तर आपण सगळेच नास्तिक.

----- शशिकांत रणवरे (ठाणे)

# तो.....

मीच काय. . . माझ्या सारखे इतरही आहेत. . .

ज्यांचा नाही विश्वास तुझ्यावर...

फक्त तू दिसत नाहीस म्हणुन नाही. .

तर.. ह्या जगात तुझ्या असण्याने काहीही फ़रक पडत नाही. . म्हणुन. .

अर्थात. . तुझ्या नसण्याने हि...

म्हणूनच नाही विश्वास. . तुझ्या अस्तित्वावर. .

अस्तित्व. . जे आम्हाला कधी जाणवलेच नाही. .

हो. . पण ‘त्या’ चे अस्तित्व नेहेमी जाणवते. .

तो.....

जो आंधळ्याच्या हातातली काठी सरकवून.. वाट बघतो. .

कि ठेच लागल्यावर तरी तो म्हणेल. . . “अरे देवा”

तो. . .

जो नुकत्याच जन्मल्या जिवाचा. . . चेहरा पाहण्या आधीच. . .

आईचे डोळे मिटतो. . . एकाच आशेने. . कि

एक टाहो फ़ुटावा. . “देवा रे. . . . .”

तो. . . .

जो अनेक पशुंच्या ओझ्याखाली. . . गुदमरल्या ती च्या तोंडुन. .

एका किंकाळी ची वाट पाहतो. . . . “नको र देवा. . . . “

तो. . .

जो जन्म जन्मांतरातल्या नात्याला. . . अशा वळणावर आणुन ठेवतो. .

कि. . . त्यांच्या तोंडी.. एकच प्रश्न यावा. . . “देवा. . . का? कशासाठी.....?

तो. . . .

जो तुझ्या बाजार मांडणाऱ्यांच्या डोक्यावर . . . छत्र धरून रहातो. .

कारण. . . ते योगा पासुन. . भोगापर्यंत. . . सारे खेळ. .

तुझ्या नावाने खेळतात. . . . खेळवतात. . . .

.

हे असे कित्येक खेळ पाहुन. . . भोगुनही.. .

आम्ही मात्र तुला नाकारतो. . .

कारण. . . इथे कुठेच. . . ‘तुझे’ अस्तित्व जाणवत नाही रे. . .

अस्तित्व जाणवते. . . . ते ‘त्याचे’

आपले नाममात्र अस्तित्व टिकवण्यासाठी. . . .

तु नेमलेल्या . . . . त्या सैतानाचे. . . .

त्याच्यावर मात्र. . . . आता विश्वास बसत चाललाय. . . .

----- समीर सामंत

# ब्रम्ह

बडबड्या आस्तिकांनो

(केवळ स्वच्छ विनोद म्हणुन . . लोभ असावा. .
रोष नसावा)

शब्दभारी भाषणाची
का तुम्हाला खुमखुमी ?
द्याविशी वाटे तुम्हाला
ईश्वराची का हमी?

या जरा. . या पाहू या
हे शब्द तुमचे वेगळे
बोलता अर्थाविना
हे कसब तुमचे आगळे!

"माया असे ब्रम्हाविना. .
अन ब्रम्ह ही तर पोकळी
पाहण्या जे ब्रम्ह जाता
भासे धरा ही मोकळी. ."
"ब्रम्ह हे सर्वत्र आहे. .
ब्रम्ह तो अन ब्रम्ह मी
देह नश्वर. . अमर आत्मा..
सांगता ऐसे तुम्ही!"

खर्चुनी शब्द सारे
सम खरी गाता तुम्ही
"देव शब्दातीत आहे. ."
हेच म्हणता नेहमी

आमुचे ऐका जरा...
मैन आता बाळगा. .
शांतता मग नांदुनी
जगु दे साऱ्या जगा!

------ निलेश पंडित

# नास्तिक वा आस्तिक

तीचा चेहरा, आरतीचे तबक
त्यात दोन नेत्ररूपी निरांजन
मध्यभागी हळद-कुंकू
कर्तव्याची जाण.. सुपारी
ओठावरचे हसु..जणु अक्षता
सोन्याचं वळं..सार संचीत
कुटुंबावर जीव ओवाळुन टाकणारी
कुटुंब-वत्सल.. गृहिणी.. आई

दैवाची जाणीव असलेली
दुर्देवास ठोकारणारी
सुदैवास स्विकारणारी
देवास मानणारी
देवपणास समजणारी
भक्त-वत्सल. . स्त्री. . आई

पाषाण-मुर्ती न जपणारी
देवळा रावळात न रमणारी
त्यातील देवास न मानणारि
नास्तिक
तरी. . . .
या देहरूपी घरातील
हृदयरूपी देवघरातील
प्रतिष्ठापित आईस
नित्य नमन करणारी
मी
नास्तिक !
वा
आस्तिक????

------ **रजनी अरणकल्ले**

# कुणासाठी

माय म्हणायची, 'सकाळी उठलं की त्याच्या पायी लागावं'

तो दिसायचाच नाही, पण मायसाठी
कुजल्या लाकडी देव्हाऱ्यापुढं वाकायचं.

त्यात भरलेले दगड, पत्र्याचे तुकडे,

झिजलेल्या पितळी मूर्ती, सुकले नारळ,

जुन्यापुराण्या फाटक्या पोथ्या, कुबट वास ......

एकदाच विचारलं होतं 'हे दगड का ठेवले?'
आणि उत्तराऐवजी पोटभर मार खाल्ला होता
उपाशीपोटी........

रात्री झोपताना आजी सांगायची

त्याच्या चमत्कारांच्या नवनवीन गोष्टी

'त्यानं याला वाचवलं, त्याला घडवलं'

मग पटत नसलं तरी आजीसाठी

म्हणायची त्याची स्तोत्रं, करायच्या प्रार्थना

मिटल्या डोळ्यांनी.
म्हणायच्या आरत्या टिपेच्या स्वरांत
बाबाच्या आवाजाला जोर यावा म्हणून.

बाबा तर देवाचाच होता

गावातल्या मोठ्या मंदिराचा फाटका पुजारी,

देवाचा सेवक, रखवालदार
दारिद्र्य मिरवणारा देवाच्या राज्याचा अनभिषिक्त सम्राट.......

देवळाच्या कोपऱ्यातल्या टीचभर खोलीत

देवानं जेवढं दिलं त्यावर कसाबसा चालणारा संसार,

तोही मायचाच.

-----

बाबानं तर केव्हाच देवाला अर्पण केलेला!

बाबा देवाचं करतो, म्हणून यानंही करावं,

केवळ बाबासाठी.

अन् एक दिवस देवाचे दागिने चोरल्याचं

बाबावर आलेलं किटाळ,

त्याचा भेदरलेला, भकास तरी निष्पाप चेहरा,

हाय खाऊन जागेवरच लाकूड झालेली आजी,

झडतीच्या निमित्तानं देवळाच्या अंगणात

विस्कटून, उधळून पडलेला

गाडग्या-मडक्याचा संसार,

याचे-त्याचे पाय धरत विनवण्या करणारी अगतिक माय

आणि सगळं वादळ उघड्या डोळ्यांनी बघणारा

गाभाऱ्यातला निर्ढावलेला तो!

दगड, हो दगडच फक्त.

चला, सुटला एकदाचा!

तुरुंगात खितपत पडून बाबा गेला,

धसक्यानं अन् उपासमारीनं मायला नेलं

आजी तर कधीच संपलेली.

आता कुणासाठी मानायचं त्याला?

क्रांती साडेकर

# धन्यवाद देवा.... नेटाक्षरी १२१

आता काय मागु देवा , तुझे ऐश्वर्य केवढे!
(तुझ्या दारात भिकारी भर पेट ओरडे)

पोटभरुनही जिथे , पोट भरतच नाही
तिथे भरल्या पोटांचे सुरू उपाशी ओरडे

मनगटांची ही उपेक्षा का रे तुझ्या महाद्वारी
म्हणे पुण्य देण्यासाठी भीक मागतो भिकारी

तुझे भीक मागणारे आशीर्वादही सोसले
एक रूपया मी दिला , दान घडेल वाटले

तुझ्या दारचा भिकारी माला गर्जुन बोलला
पाच रुपे दया हो दादा ! , कुठे जमाना चालला ?

धन्यवाद देवा तुझे मज उमजली रीत
मनापासुन ते दान मिळे मागून ती "भीक"

आता रोज घातवार, स्वैराचार, अनाचार
पाप क्षालनाला फ़क्त तुझ्या वराचा विचार

आम्ही पोसतो रे गुन्हे  तुझे धरुनिया वार
सोमवार महादेव --गणपती मंगळवार

ज्ञानियाचा अन् तुक्याचा तो तूच का रे देव
मीरा व्हावे तरी कसे?- तुझी आटली रे माव

------

कलियुगाच्या देवा ने   कानमंत्र मला दिला !
नको मागु काही वेडया   खिसा मोकळा चांगला

नसे राऊळात आता   देव घेवीतच  " देव"
देण्यासाठी नाही वेड्या, घेण्यासाठी त्याची धाव !

मयुरेश साने.

# संभ्रम

कधीतरी पायांखालची वाळू सरकते अचानक
तेव्हां आस्तिक , नास्तिकाच्या पुसटशा सीमारेषेवर
मी उभा असतो हात मोकळे सोडून.

समोर बुडत असतो सूर्य क्षितिजाच्या समुद्रात
आणि दुसऱ्याच क्षणाला दाटत असतो काळोख
तेव्हां डोळे चाचपडतात अंधाराचं दाट धुकं.

आहेच कुणीतरी पाठीशी ...असा भासच असेल ...
पण अजाणतेपणी पावलांमागून पावलं पडताना ..
या पुढचा रस्ता आपला...फक्त आपलाच वाटताना...
मागे वळून पहात नसताना...
पाठीवरचा हातही आपलाच असताना ...
झोपेत कुणीतरी चेहऱ्यावरून फिरवलंच असेल मोरपीस
असं वाटतं उगाच ... खरं ...खोटं ... उठल्यावर....

'बिटवीन द लाईन' नसले जरी संवाद ...
असतंच काहीतरी मौनाच्या पडद्याआड ...
एखादं बहरलेलं झाड .. किंवा खोल खोल आड ...
काहीतरी असतंच नक्की ..
काय असतं ...?
फुल, फुलपाखरू, वारं की कोरडाठाक तळ..?

कधीतरी पायांखालची वाळू सरकते अचानक
तेव्हां आस्तिक , नास्तिकाच्या पुसटशा सीमारेषेवर
मी उभा असतो हात मोकळे सोडून.
मी खरा नास्तिक की आस्तिक ..?
हा प्रश्न सोडवित ...
अनुत्तरीत....!

- गजानन मुळे

# बरोबर आहे..!"

पाठीला 'पंख' लावावे
कि
डोक्याला ' शिंग'
ह्या संभ्रमात सामान्य माणसाने
अलिप्त राहणं जेव्हा पसंत केलं
तेव्हा
पंखदूत म्हणाले "असं कसं ?"
शिंगसुत म्हणाले "बरोबर आहे ...बरोबर् आहे !"
मग पंख हद्द्पार झाले
अन
देवालयं
गुरूघरं
मशिदी
चर्च
ह्यांची झाली गोदामं
पंखदूत म्हणाले "असं कसं ...?"
शिंगसुत म्हणाले "बरोबर आहे बरोबर आहे !"
सामान्य माणुस म्हणाला
"आता कुणीही नकोय आम्हाला
आम्ही आमचे आतले पातळ-गाभारे
स्वच्छ केलेय
अगदी स्वच्छ
आता आम्ही नव्याने ठरवु
पांढ-याला पांढरा म्हणावं की करडा
अन
हातावर घट्टे पडेपर्यंत खरडुन काढु
रंगावर चिकटलेलं धर्माचं बांडगुळ
"आता आम्हीच आमचे 'देव' !"
( शिंगदुतांच्या कळपात आता
कुजबुज
" देव ?
देव म्हणाला का तो ?
देव ?
देव का पण? )

शिंगसूत म्हणाले
" थांबा हे असं कसं..?"
पंखदूत म्हणाले
"चालु द्या बरोबर आहे
बरोबर आहे..!"

- प्राजक्त देशमुख

एके काळी मुंबई-पुणेसारख्या शहरांत एकवटलेला मराठी वाचकवर्ग आता महाराष्ट्राच्या खेडोपाडी आणि जगाच्या कानाकोपऱ्यात पोहोचला आहे. ई साहित्य प्रतिष्ठानच्या वाचकवर्गात जसा ओमान, नॉर्वे, कझाखस्थानचा मराठी तरूण वाचक आहे तसा महाराष्ट्रातल्या विदर्भ कोकणातला युवा वाचकही आहे. मराठी पुस्तकांचं वितरण सर्वत्र शक्य होत नाही. पण स्मार्ट मोबाईल मात्र आता घरोघर पोचले आहेत. आणि त्यावर ई साहित्य प्रतिष्ठानची ई पुस्तकं वाचता येतात. वॉट्स ऍप आणि ब्ल्यु टूथ द्वारे ही पुस्तकं एकमेकांना फ़ुकट आणि सहज देता येतात. त्यामुळे अशा दूरदेशीच्या वाचकांची फ़ार मोठी सोय होत आहे. ई साहित्य प्रतिष्ठानची ईज्ञानेश्वरी आणि मोरयासारखी पुस्तकं दशलक्षावधी वाचकांपर्यंत पोहोचली. याचं कारण या माध्यमाची सहजता. ई माध्यमातून दर्जेदार सकस वाचनीय साहित्य नव्या पिढीला उपलब्ध करून देण्याचा एक महायज्ञच आम्ही उभारला आहे. आणि त्याला आपली साथ मिळाली तर यातून काही भव्य उभे राहील.

ई साहित्य प्रतिष्ठानतर्फ़े नव्या तरूण कवींना व्यासपीठ मिळवून देण्याचा प्रयत्न आहे. त्यासाठी नेटाक्षरी हे ई नियतकालिक सुरू झाले. हा नेटाक्षरीचा १२२वा अंक. आपल्याला कवितांची आवड असेल तर आपणही आमच्या या टीम मध्येअ सामिल होऊ शकता. फ़क्त एक मेल पाठवायची. सर्व लेखक-कवींना आम्ही हे आवाहन करतो की त्यांनी या नवीन माध्यमाच्या विस्ताराचा विचार करावा. मुख्य म्हणजे ई पुस्तक हे “नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहती पावकः” असे अविनाशी असल्यामुळे आपल्यानंतरच्या पन्नास पिढ्यांपर्यंत ते सुखरूप असणार याचाही विचार करावा. याच्या निर्मितीचा अत्यल्प खर्च आणि पर्यावरणाची हानी न होता त्याचा प्रसार. म्हणून हे व्यासपीठ तरूण नवलेखकांसाठी मुक्तद्वार बनले आहे. आपल्या लिखाणात कितपत दम आहे याचा लेखाजोखा घेण्यासाठी याहून अधिक चांगले माध्यम नाही. कारण वाचकांच्या स्पष्ट प्रतिक्रिया इंटरनेटवर जशा मिळतात तशा आणि त्या संख्येने समोरासमोर मिळण्याची शक्यता कमीच. नवीन लेखकांनी स्वतःच्या करियरची सुरुवात ई पुस्तकांतूनच करावी.

एक मराठी वाचक म्हणून आपणही जबाबदारीचा वाटा उचलावा. आपल्या ओळखीच्या आठ वाचकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवावे. त्यायोगे हा वृक्ष बहरत जाईल. आज पावणेदोन लाखांच्या घरात असलेला ई साहित्य प्रतिष्ठानचा वाचकवर्ग लवकरच दहा ते बारा लाखांपर्यंत पोहोचावा हे उद्दिष्ट आहे. बारा लाख म्हणजे फ़ार नाही. बारा कोटी मराठी माणसाचा फ़क्त एक टक्का. तेवढा तरी आपण कव्हर करू या. तेवढे तरी वाचक आपण जमा करू या. त्यांना नवीन आणि जुन्या चांगल्या लेखकांचे भारी भारी साहित्य देऊ या. वाचन संस्कृतीला मोबाईलच्या स्मार्ट युगात नेऊया.

ई साहित्य प्रतिष्ठानचं तिनशेवं पुस्तक लवकरच येत आहे. चार साडेचार वर्षांत तिनशे पुस्तकं. पावणेदोन लाख वाचक. साताठ लाख वेबसाईट व्हिजिट्स. बारा लाखांचं उद्दिष्ट.

कोण म्हणतो मराठी भाषेचं काही खरं नाही?

---------------------------


esahity@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान

फ़ोन : 9869674820

esahity@gmail.com

पत्ता : जी ११०२, इटर्निटी

तीन हात नाका , ठाणे, ४००६०४


Websites

www.esahity.com
www.ednyaneshwari.com
http://etyarth.blogspot.in/
http://esahityapratishthan.blogspot.in/
www.marathiriyasat.com